# स्वार्थी राक्षस



मराठी : अश्विनी बर्वे



जेकेब आपल्या मित्रांच्या मागे धावला. त्याच्या पायाखाली वाळलेली पानं कुरकुर आवाज करत दबली जात होती. त्याच्या हातात त्याच्या शाळेची पुस्तके झुलत होती.

“माझ्यासाठी थांबा,” तो जोरात ओरडला.

मॅथ्यु आणि रेचलच्या जवळ जाण्यासाठी तो खूप जोरात धावत होता. ते दोघं त्याला पहाडावर असणाऱ्या महालाकडे त्याला घेवून जात होते. तो या आधी तिथं कधीच गेला नव्हता.

नगराच्या बाहेर येवून ते थांबले. जेकेबने वर पाहिले. महाल खूप उंचावर दिसत होता. तो खूप मोठा आणि खूप जुना दिसत होता, आणि खूप भयानक वाटत होता.

महाल रिकामा होता. खिडक्यांतून अंधार दिसत होता.तिथं कोणीच राहत नव्हतं. महालाचा मालक अनेक वर्षांपासून बाहेर गेला होता. तो इतकी वर्षे बाहेर होता की कोणाला त्याची आठवण सुद्धा नव्हती.

पण जेकेबला त्या प्राचीन भीतीदायक महालाची भीती वाटत नव्हती. महालाच्या चारी बाजूला असणारी बाग सुंदर आणि आकर्षक होती.

हिरव्या गवतावर उन्हाळ्याच्या शेवटच्या दिवसातली गरम हवा चमकत होती. फुलपाखरं एका फुलावरून दुसऱ्या फुलावर उड्या मारत होती.झाडांवर पक्षी किलबिल करत होते. मंद हवेमध्ये झाडावरची पाने डोलत होती.

जेकेब मॅथ्यु आणि रेचलने आपलं जॅकेट आणि पुस्तकं गवतावर फेकली. मॅथ्यु आणि रेचल यांनी बागेत खेळायला सुरुवात केली, ते पळायला लागले.

जेकेबला खेळायचं नव्हतं. त्याने बागेतल्या एका कोपऱ्यातल्या झाडाकडे पाहिलं. झाडाला सोनेरी पिचची फळं लागलेली होती.

तो धावत त्या झाडाजवळ आला. त्याने आपला हात वर केला.उडी मारली. त्याला एक पिच तोडायचे होते.

“काय करतो आहेस तू?” एक गरजणारा आवाज त्याने ऐकला.

जेकबने मागे पाहिलं.फाटकाच्या आत एक विशाल माणूस उभा होता. तो राक्षसासारखाच होता. त्याचे पाय झाडाच्या फांदी सारखे होते. त्याचे पाय नावे सारखे होते. त्याची छाती एका पिंपा सारखी होती. तो इतका उंच होता की त्याचे डोकं झाडाच्या सगळ्यात उंच फांदीला लागत होतं. तो इतका ताकदवान होता की तो चालत असतांना धरती कापत होती.

तो खूप रागात होता.

“माझ्या बागेतून बाहेर निघ!” तो ओरडला.

“हो, महोदय! मॅथ्यु आणि रेचल म्हणाले.

मॅथ्यु आणि रेचल गवतावरून जोरात पळाले. त्यांनी आपली जॅकिटे आणि पुस्तके पटकन उचलली. आणि ते राक्षसापासून दूर पळाले. ते फाटकातून बाहेर आले, ते त्या बागेतून निघून गेले.

पण जेकेब त्या राक्षसाला बघत राहिला.

“तुमची बाग?” त्याने विचारले. “इथं तर कोणीच राहत नाही.”

दैत्य ने उसे घूर कर देखा. राक्षसाने त्याच्याकडे एकटक बघितले.

“मी इथे राहतो, काहीदिवस मी बाहेरगावी गेलो होतो. आता परत आलो. हा माझा महाल आहे. ही माझी बाग आहे. कोणी असभ्य मुलांनी येवून बाग खराब करावी असे मला वाटत नाही.”

“आम्ही काहीच खराब करत नाही,” जेकेब म्हणाला. आम्ही काही असभ्य नाही. ही बाग एवढी सुंदर आहे की, आम्ही फक्त त्यात खेळत होतो.”

“ही बाग माझी आहे!” राक्षस ओरडला, “निघ इथून!”

“ तुम्ही तर, तुम्ही ...फक्त स्वार्थी आहात.” जेकब म्हणाला.

त्याने गवतावर पडलेलं आपलं जॅकेट आणि पुस्तकं झटकन उचलली. त्या विशाल माणसाकडे त्याने क्षणभर पाहिलं आणि मग धावत त्या बागेतून बाहेर् पडला.





त्यानंतर जेकेब, मॅथ्यु आणि रेचल महालापासून दूरच राहिले. शरद ऋतू नंतर हिवाळा आला. हिवाळ्या नंतर वसंत आला. जेकेब आणि त्याचे मित्र शाळेच्या मैदानावर खेळत. ते पार्क मध्ये खेळत. ते घराच्या अंगणात खेळत असत.

पण या जागांवर खेळणे तसे खेळणे नव्हतं.

“हे महालाच्या बागेत खेळण्यासारखे नाही,” जेकेब म्हणाला.

“एखाद्यावेळेस तो राक्षस परत निघून जाईल,” मॅथ्यु म्हणाला.

“एखाद्यावेळेस तो आधीच गेला असेल,” रेचल म्हणाली.

“आपल्याला जाऊन बघायला पाहिजे, जेकेब म्हणाला. “बागेला नुस्त पाहिलं तर तो रागवू शकत नाही.”

जेकेब आणि त्याचे मित्र पळत महाला कडे गेले. महाल अजूनही विशाल, प्राचीन आणि भीतीदायक वाटत होता. खिडक्यांतून अजूनही अंधारच होता.

पण आता ते बाग बघू शकत नव्हते. राक्षसाने बागेच्या चारी बाजूला दगडांची भिंत बांधली होती. भिंतीवर एक सूचना लिहली होती.

**आत येण्यास मनाई आहे!**

**खास करून मुलांनी.**

“राक्षस अजून इथेच आहे,” मॅथ्यु म्हणाला.

“आता तो इथून जाईल असे वाटत नाही,” रेचल म्हणाला.

“चल, भिंतीवरून बघू या,” जेकेबने सुचवलं.

भिंतीजवळ एका ठिकाणी लाकडांचा ढीग पडला होता. ते त्या लाकडांवर चढले आणि भिंतीच्या पलीकडे बघू लागले.

त्यांनी तिथं जे काही पाहिलं त्याने ते हैराण झाले.

“ओह, नाही!?” जेकब बोला.

त्यांनी बागेकडे एकटक बघितलं.

आत गवत बर्फाने झाकले गेलं होतं.थंड हवा वाहत होती. झाडावर पानं नव्हती.फांद्या वाकड्या तिकड्या झाल्या होत्या आणि काळ्या पडल्या होत्या.

जेकबने आपलं डोकं हलवलं.

“काय झालं?” त्याने विचारलं. “या बागेतून हिवाळा अजून गेला कसा नाही? वसंत ऋतू का आला नाही?”

“कदाचित हे वर्ष अधिक काळ तो थांबत आहे,” मॅथ्यु म्हणाला.

“कदाचित लवकरच फुलं फुलतील,” रेचल म्हणाला.

रोज जेकेब, मॅथ्यु आणि रेचल धावत महालाकडे येत. रोज लाकडाच्या ढिगावर उभे राहत. रोज त्या भिंतीच्या पलीकडे काय आहे हे बघत. रोज जेकेब आपलं डोकं हलवी.

बागेच्या बाहेर दिवस गरम होत होते. सूर्य अधिक तापू लागला होता. फुलं उमलत होती. वसंत ऋतू हळूहळू ग्रीष्म ऋतूत बदलत होता.

पण बागेत अजून हिवाळाच होता. फुलं उमलत नव्हती. झाडावर अंकुर येत नव्हते. झाडांवर पक्षी किलबिल करत नव्हते. फुलपाखरू उडत नव्हते.

पिच च्या झाडावर फक्त एक पिच लागलं होतं. बाकी पिच खाली जमिनीवर पडले होते. ते बर्फाने झाकले गेले होते. ते वाळून पांढरट दिसू लागले होते.

“आता ही बाग आर्कषक राहिली नाही,” जेकेब म्हणाला.





जेकेब, मॅथ्यु आणि रेचल रोज बागेला बघत होते. रोज तिथं सगळं तसंच होतं. रोज तिथं हिवाळाच होता.

एक दिवस त्यांनी राक्षसाला बघितलं. तो गुलाबाच्या एका कळीकडे वाकून बघत होता. गुलाबाची छोटी कळी उमलणार होती.

“बघा!” जेकेब म्हणाला, “एक फुल.”

“शेवटी बागेत वसंत ऋतू येतोच आहे,” रेचल म्हणाली.

राक्षस त्या फुलाकडे बघत होता. त्याने वाकून त्याला स्पर्श केला. तर फुलाच्या पाकळ्या तुटून खाली पडल्या.

राक्षसाने निराश होवून निःश्वास सोडला आणि आपलं डोकं हलवलं. तो अजूनही खूप मोठा होता. तो अजूनही ताकदवर होता. पण आता तो रागावलेला नव्हता.

“तो एकटा दिसत आहे,” जेकेब म्हणाला.

“तो एकटाच राहिला पाहिजे,” रेचल म्हणाला.

“तो आमच्यावर ओरडला होता,” मॅथ्यु म्हणाला.

“आणि आपल्याला पळवून लावले होते,” रेचल म्हणाली.

“तो किती उदास दिसत आहे,” जेकेब म्हणाला. “आपल्याला त्याला मदत करायला पाहिजे.”

“मी तर त्याला मदत करणार नाही,” मॅथ्यु म्हणाला.

“मी पण त्याला मदत करणार नाही,” रेचल म्हणाली.

जेकबने राक्षसाकडे पाहिलं. तो आपल्या सुकलेल्या बागेकडे बघत होता. त्याने सुकलेल्या फुलांकडे आणि वाळलेल्या झाडांकडे पाहिले. त्याने हळूच आपलं डोकं हलवलं. तो वळला आणि परत महालात गेला.

“मी आपल्याला मदत करणार होतो,” जेकेबने हळू आवाजात म्हटलं, “जर मला समजलं तर.”

मॅथ्यु आबू रेचल लाकडांच्या ढिगावरून उतरले. जेकेबला फार वाईट वाटत होते. त्याने बागेकडे परत एकदा शेवटचं पाहिलं. खाली उतरण्यासाठी तो वळला.

तो डगमगला. त्याचा पाय घसरला आणि लाकडं खाली पडू लागली. त्याने भिंतीवर पाय मारले. स्वतःला सांभाळण्याचा खूप प्रयत्न केला. पाय मारल्यावर भिंतीचे दगड हलू लागले..

“बघा,” जेकेब म्हणाला, “हे दगड सैल आहेत.”

मॅथ्यु आणि रेचलने त्या दगडाला हलवण्यासाठी मदत केली. त्याला ओढलं. त्याला झटका दिला. पटकन दगड भिंतीपासून वेगळा झाला.

ते सगळे मागे गवतावर पडले. तो दगडाकडे एकटक बघू लागला. भिंतीत लावलेल्या त्या दगडाच्या जागेवर तो बघू लागला. ती खुण भिंतीच्या आरपार होती आणि त्याच्या पलीकडे बाग दिसत होती.

“आपण ह्या भोकातून आत जावू या का? मॅथ्युने विचारलं.

“हो,” रेचल म्हणाली. “जर तू घाबरला नसलास तर.”

“मी घाबरले नाही,” रेचल म्हणाली. “काय तू घाबरला आहेस का? जेकेब?”

“नाही,” जेकेब म्हणाला. “मी घाबरलो नाही.”

“ठीक आहे,” रेचल म्हणाली. “मग तू पहिले आत जा.”

जेकेबने तो घाबरलेला नाही हे दाखवण्याचा प्रयास केला. त्याने भोकातून आत पाहिले. तो आत घुसला. रांगत दुसऱ्या बाजूला गेला.





जेकब बागेत गेला. मॅथ्यु आणि रेचल पण त्याच्या मागे गेले.

झाडांमधून हवा जोरात वाहत होती. त्यांच्या पायाखाली बर्फ होता. त्यांच्या नाकातून येणारी हवेतून पांढरा पांढरा ढगा सारखा धूर निघत होता.ते कापत होते. ते खूप उदास होते.

“आपल्याला निघून जायला हवं,” मॅथ्यु म्हणाला.

“राक्षस आपल्यावर ओरडेल,” रेचल म्हणाली.

“मला नाही वाटत तो असं करेल,” जेकेब म्हणाला.

“तो आपल्या सर्वांवर ओरडेल,” मॅथ्यु म्हणाला.

“आपण त्याच्या बागेची भिंत तोडली,” रेचेल म्हणाली.

“नाही,नाही तो ओरडणार नाही,” जेकब म्हणाला. “आपण इथे कोपऱ्यात पिचच्या झाडाजवळ थांबू. राक्षस आपल्याला बघू शकणार नाही. झाडाच्या फांद्या आपल्याला झाकून टाकतील.”

“ठीक आहे,” मॅथ्यु म्हणाला.

“पण इथं थोड्याच वेळ थांबू या,” रेचल म्हणाली.

मॅथ्यु आणि रेचल बर्फाचे पुतळे करण्यासाठी धावले.

जेकबलाही बर्फाचा पुतळा करायचा होता. तो पिचच्या झाडाकडे एकटक बघत होता. तो झाडावर लागलेले पिच बघत होता. पिच झाडावर सगळ्यात वरच्या फांदीवर लटकलेले होते.

त्याने आपले हात फैलावले आणि त्याने उडी मारली. त्याला पिच तोडायचे होते.

“तू ते असे तोडू शकणार नाही,” एक आवाज गर्जत त्याच्या पर्यंत आला.

एक मोठ्या हाताने त्याला उचलले. उचलून त्याला त्या झाडाच्या सगळ्यात उंच फांदीपर्यत घेवून गेला.

जेकेबने मागे वळून बघितले. तो सरळ स्वार्थी राक्षसाच्या डोळ्यात बघत होता..

“ओह!” जेकब म्हणाला.

राक्षस त्याच्याकडे बघून हसला.

त्याला उचलून राक्षसाने त्याला झाडावर नेले. त्याने जेकेबला पक्कं पकडून ठेवलं. जेकेबने हात पुढे केला. त्याने सगळ्यात उंच फांदीला लागलेले पिच तोडले.

“धन्यवाद,” जेकेबने हळू आवाजात म्हटलं.

“नाही,” राक्षस म्हणाला. “तुझेच आभार.”

राक्षसाने पिचच्या झाडाकडे बघत म्हटलं. त्याच्या फांद्यावर नवीन अंकुर आले होते. मग ते पानामध्ये बदलत होते.

जेकब त्याकडे एकटक बघत राहिला. त्याने वळून बागेकडे पाहिलं.

जिथं रेचल आणि मॅथ्यु खेळत होते. तिथला बर्फ वितळत होता आणि हिरवे गवत येत होते. ढगांच्या मागे लपलेला सूर्य बाहेर येत होता. गवतावर फुलपाखरं बागडत होती. झाडांवर पक्षी किलबिलत होते. बागेत सगळीकडे फुलं उमलत होती.

“शेवटी वसंत आलाच!” जेकेब म्हणाला.

“हो,” तो विशाल माणूस म्हणाला. “तुम्ही त्याला घेवून आलात. तुम्ही माझ्याकडे आणि माझ्या बागेत आनंद घेवून आले. आणि हा सगळा आनंद वसंताने आणला.”

त्या दिवसांनतर जेकब, मॅथ्यु आणि रेचल रोज बागेत जात. त्यांनी राक्षसाला टाग खेळायला शिकवले. पिच तोडण्यासाठी राक्षस त्यांना उचलून झाडावर घेवून जात असे. ते पिच तोडत आणि फुलपाखरांच्या मागे धावत.

बागेत गरम हवा आली. मग पानगळ सुरु झाली. मग हिवाळा आला. पण हिवाळ्यात बाग फुलायची थांबली नाही. बर्फ वितळला. सूर्य चमकू लागला. दरवर्षी बागेत वसंत येवू लागला.

**समाप्त**